रोजगार व स्वयंरोजगार यंत्रणेतील रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी,गट-ब या पदावर (सरळसेवा भरती) नियुक्ती देण्याबाबत.
नियुक्ती रद्द करणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## रोजगार व स्वयंरोजगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः इएसई-२०१३/प्र.क्र.६४ /प्रशा-२

जी. टी. रुग्णालय संकुल, ५ वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई-४००००१.
दिनांक : २२ जुलै, २०१४

वाचा :-

१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१८४४/(३)/३/सात, दिनांक ३०/०३/२०१३.
२) शासनाचा समक्रमांकाचा दिनांक ०१ मार्च, २०१४ रोजीचा शासन निर्णय.
३) श्रीमती मनिषा उदाराम गजभिये यांचा दिनांक २७ मार्च, २०१४ रोजीचा अर्ज.
४) शासनाचे समक्रमांकाचे दिनांक २० मे, २०१४ रोजीचे पत्र.
५) उपसंचालक, रोजगार व स्वयंरोजगार विभागीय मुख्यालय, नागपूर यांचे पत्र क्रमांक रोस्वरोउसं/विमुना/कक्ष -१/रुजु अह./१०९९-११००/२०१४, दिनांक १६ जून, २०१४.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन क्रमांक १ च्या पत्रान्वये शिफारस केलेल्या श्रीमती मनिषा उदाराम गजभिये (गुणवत्ता क्रमांक १७) यांची शासनाच्या संदर्भाधिन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये रोजगार व स्वयंरोजगार विभागात रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-ब (वेतनश्रेणी ₹९३००-३४८०० ग्रेड वेतन ₹४४००) या पदावर महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ९ (४२) मध्ये विहित केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार परिविक्षाधीन म्हणून तात्पुरती नियुक्ती करण्यात आली असून त्यांची पदस्थापना आदिवासी उमेदवारांकरिता रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र, देवरी जि. गोंदिया या कार्यालयात करण्यात आली आहे. श्रीमती गजभिये यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्रमांक ३ च्या अर्जात कोणतेही कारण नमूद न करता त्यांना सदर पदावर रुजू होण्यास ६ महिन्यांची मुदतवाढ देण्याची विनंती केली. त्यास अनुसरून शासनाच्या संदर्भाधिन क्रमांक ४ च्या पत्रान्वये श्रीमती गजभिये यांची उपरोक्त विनंती अमान्य करण्यात आली. तसेच, सदर पत्र प्राप्त झाल्यापासून ८ दिवसात श्रीमती गजभिये ह्या रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, आदिवासी उमेदवारांकरिता रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र, देवरी जि. गोंदिया या पदावर रुजू न झाल्यास सदर पदावर रुजू होण्यास त्यांना स्वारस्य नाही असे समजून त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल, असेदेखील त्यांना कळविण्यात आले आहे. तथापि,

श्रीमती मनिषा उदाराम गजभिये ह्या अद्यापपर्यंत रुजू झाल्या नसल्याने त्यांची रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, आदिवासी उमेदवारांकरिता रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र, देवरी जि. गोंदिया या पदावरील नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत श्रीमती मनिषा उदाराम गजभिये (गुणवत्ता क्रमांक १७) ह्या अद्यापपर्यंत त्यांना शासनाच्या संदर्भाधिन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये नियुक्तीने पदस्थापना देण्यात आलेल्या रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी (गट-ब), आदिवासी उमेदवारांकरिता रोजगार व स्वयंरोजगार माहिती व मार्गदर्शन केंद्र, देवरी जि. गोंदिया या पदावर रुजू झाल्या नसल्याने त्यांची सदर पदावरील नियुक्ती या शासन निर्णयाद्वारे रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२२१४३८००५००३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anand Sajjan Ramteke

Digitally signed by Anand Sajjan Ramteke
DN: c=IN, o=Government of maharashtra, ou=ESE, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anand Sajjan Ramteke
Date: 2014.07.22 14:35:36 +05'30'

(आनंद स. रामटेके)

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र १-२, मुंबई/नागपूर,
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
५. आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
६. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई,
७. उप संचालक, रोजगार व स्वयंरोजगार, विभागीय मुख्यालय (नागपूर)
८. जिल्हा कोषागार अधिकारी (गोंदिया),
९. संबंधित अधिकारी.
१०.निवड नस्ती (प्रशा-२).